दै. महाराष्ट्र टाईम्स, पुणे
शुक्रवार दि. २५ मे २०१८



# प्राचीन सागरी सत्ताधीश

**परंपरा आरमाराची** भाग २

अनिकेत यादव

बालमित्रांनो, काल आपण आपल्या प्राचीन भारताची नौकानयन परंपरा पाहिली. आज आपण ओळख करून घेणार आहोत, आपल्या सागरी सत्ताधीशांची.

ऋग्वेदातील एका श्लोकानुसार तुग्राने आपला मुलगा भ्रुज्यु यास एका बेटावर नाविक युद्धासाठी पाठविल्याचा उल्लेख आला आहे. बहुधा, ज्ञान वर्णनांपैकी हा पहिलाच नाविक युद्धाचा उल्लेख असावा. प्रभू श्रीरामाचे पूर्वज रघुराजाचे वंग देशावर झालेल्या आक्रमणांमध्ये युद्धनौकांचा उल्लेख आलेला आहे. राम हे वनवासासाठी जात असताना त्यांनी गंगा नदी ओलांडण्यासाठी युद्धनौकेचा वापर केल्याचे उल्लेख आहेत. रामायणातील किष्किंधाकांडात वनराज सुग्रीवाने त्याच्या अनुयायांना सीतादेवींचा शोध वेगवेगळ्या द्वीपांवर करावा, असा आदेश दिला आहे. वालीने सुग्रीवाला आपल्या राज्यातून हाकलून दिले होते. तेव्हा आपल्या आरमारासह सुग्रीव अनेक बेटांवर जाऊन आला असल्यामुळे त्याने या सगळ्या बेटांचा उल्लेख केला आहे. महाभारतातही भारताबाहेरील द्वीपे ही पांडवांपैकी सहदेवाने जिंकल्याचा उल्लेख आहे.

माळव्याचा राजा भोर नरपती यांनी लिहिलेल्या 'युक्तिकल्पतरू' या ग्रंथात नौकानयनाची बरीच माहिती दिली आहे. पाली भाषेत लिहिलेल्या अनेक जातक ग्रंथांमध्येही असे उल्लेख आहेत. यात राजा सिंहबाहू आणि राजकुमार विजय यांच्या आरमाराचे वर्णन आहे. सम्राट चंद्रगुप्त मौर्याच्या युद्धखात्यातील सहा मंडळांपैकी एक मंडळ आरमाराचे होते. चंद्रगुप्ताचे मोठे नौदल असून, त्याची व्यवस्था पाहण्यासाठी नावाध्यक्ष नावाचा आरमारी अधिकारी होता. पहिल्या शतकातील राजा खारवेल याने पश्चिम समुद्राधिपती सातकर्णी याचा पराभव केला. या दोघांत नाविक युद्ध झाल्याचे उल्लेख आहेत. रत्नागिरी आणि सिंधुदुर्ग या जिल्ह्यांच्या सीमेवरील खारेपाटण येथे सापडलेल्या ताम्रपटामध्ये शिलाहार राजा अनंतपाल यांच्या आरमाराची माहिती दिलेली असून, त्याच्याकडे वासैद नावाचा अरब अधिकारी कामाला होता. सातवाहन राणी गौतमी सातकर्णी या कर्तबगार स्त्रीने तिचा पुत्र गौतमीपुत्र सातकर्णी याचे सागरावर आधिपत्य दाखवणारा 'त्रिसमुद्रपीततोयवाहन' असा नाशिकजवळील लेण्यांत उल्लेख केला आहे. याचाच अर्थ तीन समुद्रांवर यांचे अधिराज्य होते. याच काळात सातकर्णी राजाची वीरपत्नी नागनिकाने नाणेघाटात एक शिलालेख कोरला. याच नाणेघाटात कल्याणहून घाटावर येणारा एक व्यापारी मार्ग होता. नाणेघाट कोरण्याची गरज पडली, म्हणजेच त्या काळाच समुद्री व्यापार मोठ्या प्रमाणावर सुरू होता. मुंबई जवळचे घारापुरी (एलिफंटा) हे बेट जिंकण्यासाठी चालुक्य राजा पुलकेशी याने शेकडो युद्धनौकांचा वापर केला. शिलाहार राजा सोमेश्वर आणि देवगिरीचा यादव राजा महादेव यांच्यामध्ये झालेल्या नाविक युद्धावर आधारित चित्रण बोरिवली स्टेशनजवळील एकसर येथील वीरगळांवर केलेले आहे. शालिवाहन, सातवाहन, आंध्र, पल्लव या राजांच्या नाण्यांवर जहाजांच्या आकृत्या कोरलेल्या आहेत. याचा अर्थ या राजसत्तांकडे प्रबळ आरमार होते, हे सिद्ध होते.



